**अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेच्या मान्यतेच्या अधिन राहून शैक्षणिक वर्ष २०१७-१८ पासून पदविका अभ्यासक्रमाच्या संस्थेच्या नावात बदल करण्यास शासनाची मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. मान्यता-२०१७/(प्र.क्र. ६९/१७)/तांशि-५**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०६ जुलै, २०१७.

<u>वाचा :-</u> १) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमयुएन-२०१५/प्र.क्र.१४४/नवि-१८, दिनांक १६ मार्च, २०१७.
२) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.१०/एनजीपी/अचलपूर/हस्तांतरण/२०१७/३६१९, दिनांक २९/०६/२०१७.

<u>प्रस्तावना :-</u>

उपरोक्त नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. क्र.एमयुएन-२०१५/प्र.क्र.१४४/नवि-१८, दिनांक १६ मार्च, २०१७. अन्वये अचलपूर नगरपरिषदेचे तंत्रनिकेतन महाविद्यालय महाविद्यालयाच्या १.१ हेक्टर जागेसह, त्यावरील इमारत बांधकाम व इमारतीतील साहित्यासह विनामोबदला उच्च व तंत्र शिक्षण विभागाकडे सर्व चल व अचल मालमत्तेसह कायमस्वरुपी हस्तांतरीत करण्यात मान्यता देण्यात आलेली आहे. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई यांनी त्यांचे दिनांक २९/०६/२०१७ चे पत्रांन्वये अचलपूर नगरपरिषदेचे तंत्रनिकेतन, अचलपूर या संस्थेस शासकीय तंत्रनिकेतन म्हणुन घोषित करणेबाबत शासन स्तरावरून निर्णय घेण्याबाबत विनंती केलेली आहे.

अचलपूर नगरपरिषदेचे तंत्रनिकेतन, अचलपूर या संस्थेचे नावात शासकीय तंत्रनिकेतन, अचलपूर असा बदल करण्याबाबत शासनाचे ना-हरकत प्रमाणपत्र अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांना पाठवून त्यानंतर त्यांची मान्यता मिळेपर्यंत काही कालावधी लागणार आहे. पोस्ट एस.एस.सी. पदविका अभियांत्रिकी अभ्यासक्रमांच्या केंद्रीभुत प्रवेशाची सुरू असलेली प्रवेशप्रक्रीया तत्पुर्वी संपुष्टात येणार असल्यामुळे, सदर संस्थेत प्रवेश घेण्याकरीता इच्छुक असलेल्या विद्यार्थ्यांचे नुकसान होऊ नये म्हणून अचलपूर नगरपरिषद तंत्रनिकेतन, अचलपूर या संस्थेच्या नावात शैक्षणिक वर्ष २०१७-२०१८ पासून शासकीय तंत्रनिकेतन, अचलपूर असा बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांचे मान्यतेच्या अधिन राहून खालील पदविका स्तरावरील संस्थेच्या नावात शैक्षणिक वर्ष २०१७-१८ पासून खालीलप्रमाणे बदल करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | संस्थेचे जुने नाव | संस्थेचे नवीन नाव |
|---|---|---|
| १ | नगर परिषद पॉलिटेक्नीक,अचलपूर, नेहरू मैदान, अचलपूर कॅम्प (परतवाडा), जिल्हा-अमरावती. | शासकीय तंत्रनिकेतन, अचलपूर, नेहरू मैदान, अचलपूर कॅम्प (परतवाडा), जिल्हा-अमरावती. |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०७०६१२३७३१७००८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Raghunath Katkar

Digitally signed by Anil Raghunath Katkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3fec0b0f5c05dc9058175992109e62d3f5719b9dfb87a96579dc30c265d67ce, serialNumber=2356d82c73e8a0c7b6da68b6511197206b94720842cda576febebf84581fc52a, cn=Anil Raghunath Katkar
Date: 2017.07.06 12:38:07 +05'30'

**(अ.र. काटकर)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. प्रधान सचिव (नवि-२) यांचे वि.का.अ., नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
२. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
३. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, वांद्रे (पुर्व), मुंबई,
४. सहसंचालक विभागीय कार्यालय, अमरावती (तंत्र शिक्षण संचालनालयामार्फत),
५. संबंधित संस्था (तंत्र शिक्षण संचालनालयामार्फत),
६. अतिरिक्त सचिव (तांत्रिक), भारत सरकार, अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, ७ वा मजला, चंद्रलोक भवन, जनपथ, नवी दिल्ली ११०००१.,
७. विभागीय अधिकारी, पश्चिम विभागीय कार्यालय, इंडस्ट्रियल इन्शुरन्स बिल्डिंग, दुसरा मजला, चर्चगेट, मुंबई,
८. निवड नस्ती / तांशि-५.